अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील मान्यवर व्यक्तींचे स्मारक बांधणे तसेच सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे यासाठी स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बैठक़ २०१६/प्र.क्र.४३७/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६ जानेवारी, २०१७.

**संदर्भ**:- शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच २०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे दि.१६ डिसेंबर २०१५

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये,अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील मान्यवर व्यक्तींचे स्मारक बांधणे तसेच सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे यासाठी स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याविषयीचे निकष व मार्गदर्शक तत्वांना मान्यता देण्यात आली आहे.सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या विहीत कार्यपध्दतीनुसार ,या योजनेंतर्गत विविध संस्थांकडुन प्राप्त प्रस्तावांची छाननी करून आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय,पुणे यांच्याकडुन मा.मंत्री,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीच्या मान्यतेसाठी या विभागास वेळोवेळी पाठविण्यात आले आहेत.सदर प्रस्तावांवर शासनस्तरावर निर्णय घेण्यासाठी,मा.मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीची बैठक दि.१३ जुलै २०१६ रोजी संपन्न झाली.सदर बैठकीत आयुक्त,समाज कल्याण,पुणे यांच्याकडुन प्राप्त प्रस्ताव समितीने विचारार्थ घेतले.समितीने सदर प्रस्तावांबाबत घेतलेल्या प्रकरण निहाय निर्णयांच्या अनुषंगाने,सदर प्रस्तावांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील मान्यवर व्यक्तींचे स्मारक बांधणे तसेच सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे यासाठी स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करणे या योजनेंतर्गत विविध स्वयंसेवी संस्थांकडुन प्राप्त प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या मा.मंत्री (सा.न्या.व वि.स.) यांच्या अध्यक्षतेखालील समितीची बैठक दि.१३ जुलै २०१६ रोजी संपन्न झाली.सदर बैठकीमध्ये समितीने सोबतच्या परिशिष्ट ”अ“नुसार प्रकरणनिहाय निर्णय घेतले. समितीने घेतलेल्या निर्णयानुसार संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याबाबत काटेकोरपणे तपासणी करून समितीच्या मान्यतेने प्राप्त प्रस्तावांबाबतचे प्रकरणनिहाय स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. या योजनेअंतर्गत होणारा खर्च हा “मागणी क्रमांक एन-३, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण-०१, अनुसूचित जातीचे कल्याण, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनातंर्गत योजना- राज्य योजनातंर्गत योजना, (०५), स्वयंसेवी संस्थांना

सहाय्यक अनुदाने, (०५)(०२) स्वंयसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५३६३६), ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

३. याकरीता आयुक्त,समाजकल्याण आयुक्तालय,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी संबंधित संस्थेकडुन संदर्भाधीन शासन निर्णयातील निधी वितरणविषयक अटींची पूर्तता होत असल्याची खातरजमा करून,वित्त विभागाने विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार त्या त्या टप्प्यावर सदरहू कामांकरीता निधी वितरीत करावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय,संदर्भाधीन शासन निर्णयान्वये,मंत्री(सा.न्या व वि.सहाय्य) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितिस दिलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१७०१०६१७३८०४०५२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.01.06 18:05:59 +05'30'

**(अनिल कों.आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय मुंबई
६) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
८) मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
९) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
१०) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, पुणे.
११) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३) सर्व संबधित स्वंयसेवी संस्था
१४) निवडनस्ती, कार्यासन-बांधकामे, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मुंबई.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांकः बैठक्र २०१६/प्र.क्र.४३७/बांधकामे,
दिनांक- ०६जानेवारी, २०१७ सोबतचे विवरणपत्र अ

| अ.क्र | शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच २०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे दि.१६ डिसेंबर २०१५ च्या तरतूदीनुसार स्वयंसेवी संस्थांकडुन प्राप्त प्रस्तावांचा तपशिल | शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच २०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे दि.१६ डिसेंबर २०१५ अन्वये गठीत समितीने दि.१३ जुलै २०१६ च्या बैठकीत घेतलेल्या प्रकरणनिहाय निर्णयांचा तपशिल |
|---|---|---|
| १ | अहिल्याबाई होळकर बहुउद्देशीय शिक्षण संस्था,मु.सिहोरा,ता.पारशिवणी, जि.नागपूर विपश्यना केंद्र इत्यादी उभारण्याचा प्रस्ताव- रू.८ कोटी २६ लक्ष | सदर प्रस्तावास रू.२ कोटीच्या मर्यादेत तत्वत : मान्यता देण्यात आली. |
| २ | मौजे वलनी,खसरा क्र.५,ता.हिंगणा ,जि.नागपूर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर अभ्यासकेंद्र व वाचनालयाचे बांधकाम करण्याकरीता अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव- रू.९८.९७ लक्ष | सदर प्रस्तावास तत्वत : मान्यता देण्यात आली. प्रमाणित अंदाजपत्रक समितीसमोर सादर करून तद्नंतर मान्यता देण्यात येईल. |
| ३ | बुध्दवन (रामगिरी) ता.कळमेश्वर, जि.नागपूर येथील पर्यटन स्थळाचा विकास करण्याकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव- रू.९ कोटी | सदर प्रस्तावास रू.२ कोटीच्या मर्यादेत तत्वत : मान्यता देण्यात आली. |
| ४ | डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मारक समिती, किनवली, ता.शहापूर, जि.ठाणे या स्वयंसेवी संस्थेला अनुदान देण्याबाबत- रू.२ कोटी १५ लक्ष | सदर प्रस्तावास रू.२ कोटीच्या मर्यादेत तत्वत : मान्यता देण्यात आली.प्रमाणित अंदाजपत्रक समितीसमोर सादर करून तद्नंतर मान्यता देण्यात येईल. |
| ५ | डॉ.बाबासाहेब आंबेडकर सभागृह आणि मेडीटेशन सेंटर तसेच आयएएस, युपीएससी, एमपीएससी, आयपीएस अभ्यासक्रम सेंटरच्या बांधकामाकरीता अनुदान मिळणेबाबत दिपांकर विपश्यना मेमोरीयल ट्रस्ट मु.कासने,पो.वाशिंद ता.भिवंडी, जि.ठाणे - रू.९ कोटी ५१ लक्ष | सदर प्रस्तावास रू.२ कोटीच्या मर्यादेत तत्वत : मान्यता देण्यात आली. समितीसमोर विहीत कागदपत्रे सादर करून प्रस्तावास मान्यता घ्यावी. |
| ६ | जेतवन बहुउद्देशीय वास्तुच्या निर्माण कार्यासाठी विशेष आर्थिक सहाय्य मिळण्याबाबत बोधिसत्व डॉ.बाबासाहेब आंबेडकर कल्चरल फाउंडेशन, नंदुरबार - रू.५ कोटी | सदर प्रस्तावास रू.२ कोटीच्या मर्यादेत तत्वत : मान्यता देण्यात आली. प्रमाणित अंदाजपत्रक समितीसमोर सादर करून तद्नंतर मान्यता देण्यात येईल. |

| | | |
|---|---|---|
| ७ | दिक्षाभूमी,नागपूर येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर समितीव्दारे मध्यवर्ती स्मारकाच्या अनुषंगाने सभागृह व ग्रंथालयाच्या इमारतीकरीता विद्युत पुरवठा व जनरेटर लावण्याबाबत-रू.३१ लक्ष | सदर प्रस्तावास तत्वत : मान्यता देण्यात आली. |
| ८ | क्रांतीज्योती सावित्रीबाई फुले यांचे जन्मगाव नायगाव ता.खंडाळा, जि.सातारा येथील स्थळांचा विकास करणे-रू.९९.९९ लक्ष | सदर प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्यात आली. |

*************************